प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या आवारातील कामांच्या रु.५,७७,७८२/-इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मंजुरीबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक :- एमव्हीडी-१२०९/प्र.क्र.१०५ /परि-४,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दि. १० नोव्हेंबर, २००९

वाचा : परिवहन आयुक्त कार्यालय यांचे क्र.पआ/एमएच१५/३०७/का-१०/२००९/
जा.क्र.-३४६६, दि. २६ मार्च, २००९ चे पत्र.

प्रस्तावना : प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या आवारातील विविध स्वरुपाची बांधकामे करणे आवश्यक झाले आहे. त्यामुळे सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील कामे करुन घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय : प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक येथील कार्यालयाच्या इमारतीच्या आवारातील सोबत जोडलेल्या विवरण पत्राप्रमाणे कामे करण्यासाठी रु.५,७७,७८२/- (रुपये पाच लाख सत्याहत्तर हजार सातशे ब्याऐंशी फक्त) इतक्या खर्चास याद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०००/प्र.क्र.-४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१ सदरच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार अधिनियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग भाग-२ अ.क्र. ३ व सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील अ.क्र.-१, परि क्र.१३४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक (२००९१११०१८५९२०००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र. चं. मयेकर)
शासनाचे अवर सचिव

सहपत्र :- विवरणपत्र

प्रति,

महालेखापाल (लेखा परीक्षा लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रादेशिक परिवहन अधिकारी, नाशिक
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
वित्त विभाग (व्यय-८/विनियम), मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (परि-४)